**वार्षिक योजना सन २०१४-१५ अंतर्गत सिंहस्थ कुंभमेळयासाठी नाशिक येथे तातपुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर CCTV यंत्रणा बसविण्याकरिता रुपये ७,११,००,०००/- इतकी रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सीसीटी-०२१५/प्र.क्र. ४१/पोल-३,**
मंत्रालय, २ रा मजला,मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- ३१ मार्च, २०१५.

**संदर्भ :-** १) गृह विभाग, शा.नि. क्र.आयएसएस-१०१३/प्र.क्र. ३२२/विशा-४, दि. ३.१२.२०१४,
२) पोलीस महासंचालक,मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/१७/६१६२/सिंहस्थ कुंभमेळा-नाशिक/२८/२०१३, दि. १३.३.२०१५
३) पोलीस आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र. लेशा/कक्ष-५/सिंहस्थ शाखा/ सीसीटीव्ही/ ३१७/२०१५ दि. २८.३.२०१५

**शासन निर्णय** :-

वार्षिक योजना सन २०१४-१५ अन्वये संदर्भ क्र. १ नुसार नाशिक येथील कुंभमेळयासाठी भाडेतत्वार सी.सी.टी.व्हि. यंत्रणेसाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून सदरचा निधी आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त, नाशिक यांचेकडे सुपुर्द केला आहे. त्यातील अटी व शर्तीनुसार व कुंभमेळयाचे महत्व व तेथील तातडीची निकड पाहता रु. ७,११,००,०००/- (रु. सात कोटी अकरा लाख फक्त) इतकी रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) यापूर्वी संक्षिप्त देयकावर काढलेल्या सर्व रकमांची तपशीलवार देयकांचा तत्परतेने निपटारा करण्यात येईल.

२) या संक्षिप्त देयकांचे तपशीलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

३) खर्च नियमित देयकाव्दारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

४) या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची व्यक्तिगत जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहिल.

५) मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरिता निधी उपलब्ध आहे.

२. सदरचा खर्च "मागणी क्रमांक बी-१०, ४०५५ - यावरील भांडवली खर्च, (००) ८०० इतर खर्च (००) (०९) सार्वजनिक ठिकाणी CCTV संनियत्रणे बसविणे (४०५५ ०२२३) ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ करीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२०/१५/विनियम, दिनांक ३०.०३.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०६१३१६२५९९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: CN = Kailas Arjun Gaikwad, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.04.07 15:11:57 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) पोलीस आयुक्त,नाशिक,
३) विशेष पोलीस महानिरिक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक
४) आयुक्त, नाशिक महानगरपालिका
५) जिल्हाधिकारी, नाशिक
६) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई,
७) अधिदान व लेखा अधिकारी, नाशिक,
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
९) वित्त विभाग (का.व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई,
१०) निवडनस्ती/गृह विभाग (पोल-३),